आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० करीता शासकीय आश्रमशाळा इमारती बांधणे लेखाशीर्ष (४२२५ १११८ ) अंतर्गत निधी वितरण

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/ प्र.क्र. ५६ /कार्यासन.६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**तारीखः ३१ जानेवारी,२०२०**

वाचा

१) शासन परिपत्रक वित्त विभाग,क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि.०१.०४.२०१९
२) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३ दि.०८.०७.२०१९.
३) शासन ज्ञापन क्र. आविवि, क्र.बीयुडी-२०१९/प्र.क्र.५६/का-६ दि.२७/०५/२०१९.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक.बीयुडी-२०१९/प्र.क्र. ५६/कार्यासन.६ दि.२६.०७.२०१९
५) बांधकाम व्यवस्थापन कक्ष, (आ.वि.वि.) यांची नस्ती क्र. अर्थवि-२०१९/प्र.क्र.५७/बांव्यक.टिप्पणी दि.२७.०१.२०२०

**शासन निर्णय-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या वर्षात मागणी क्रमांक टी-६ मुख्य लेखाशिर्ष ४२२५ , अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, ०२ अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, अंतर्गत (०२) (०६) आश्रमशाळेच्या इमारती बांधकाम करणे (४२२५ १११८), ५३- मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या वर्षाकरीता रु. ३४.०० कोटी इतकी तरतुद अर्थसंकल्पीत असुन वित्त विभागाने विहीत केलेल्या ६० टक्के निधी वितरण मर्यादेत रु.२०.४० कोटी इतका निधी सद्यस्थितीत वितरणासाठी उपलब्ध आहे. त्यापैकी संदर्भाधीन क्र.३ व ४ येथील शासन निर्णयाद्वारे यापुर्वी रु. १५.२१ कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे.

आश्रमशाळेच्या बांधकामाकरीता उपरोक्त संदर्भाधीन क्र. ५ येथील निधी मागणी प्रस्तावास अनुसरुन सन २०१९-२० या वर्षातील अर्थसंकल्पीत तरतुदीमधुन सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमुद केल्यानुसार **९ कामांना** रकाना ५ नुसार एकूण **रु.५१८.७४ लाख** इतका निधी खालीलप्रमाणे

नियंत्रक अधिकारी तथा अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, **नाशिक** यांना (BEAMS) अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली वर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र | नियंत्रक अधिकारी | कामांची संख्या | सदर ज्ञापनाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ , नाशिक. | ९ | ५१८.७४ |
| **एकुण** | | ९ | **५१८.७४** |

२. सदर निधीचे वितरण खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१) संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी सोबतच्या विवरणपत्रात नमुद ९ कामांना प्रशासकीय /सुधारीत प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेतच खर्च करण्याबाबत दक्षता घ्यावी.

२) सोबतच्या विवरणपत्रात नमुद केलेल्या कामांवरच सदरील निधी खर्च होईल याची दक्षता संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी

३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक यांचे मार्फत सदर बांधकामांना वेळोवेळी भेटी देण्यात येवून कामाचा दर्जा, गुणवत्ता यांची तपासणी करावी व वितरीत करण्यात आलेला निधी योग्य रित्या खर्च होत आहे याची दक्षता घ्यावी.

४) वितरीत करण्यात आलेला निधी दि. ३१ मार्च, २०२० अखेर खर्च होणे आवश्यक आहे.

५) सदर वितरीत निधीमधुन झालेला खर्चाचा अहवाल नियंत्रक अधिकारी यांनी एकत्रित करुन तो विहित प्रपत्रात शासनास सादर करावा.

६) वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित शासन परिपत्रकामधील विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

३. सदर शासन निर्णय संदर्भ क्र.१ व २ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२००१२८१५४०४५७२२४** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.01.31 15:34:52 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई..
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव आदिवासी विकास, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
८. प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र, राजुर,तळोदा, नंदुरबार,कळवण.
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ,नाशिक.
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, धुळे.
११.महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२.अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे.
१५.वित्त विभाग (व्यय १४/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई-३२
१६.निवड नस्ती (का-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१९/ प्र.क्र. ५६ /कार्यासन.दि.३१/०१/२०२० सोबतचे विवरणपत्र**

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता | माहे, मार्च २०१९ पर्यंत खर्च | सदर शा.नि.द्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम(आदिवासी) मंडळ विभाग,नाशिक | | | | |
| कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम(आदिवासी) मंडळ विभाग,धुळे | | | | |
| | | | | ( रु. लाखात) |
| १ | साकुर येथील मुला- मुलींचे वसतीगृह बांधकाम | ४८५.८१ | १५०.५५ | **४५.७४** |
| २ | शासकीय आश्रमशाळा दोधेश्वर ता.कळवण जि.नाशिक येथे शालेय इमारतीचे बांधकाम. | ४९२.०३ | १७०.१५ | **२८.००** |
| ३ | शासकीय आश्रमशाळा भालेर येथे मुलांचे वसतीगृह बांधकाम ता.जि.नंदुरबार | १४०७.९० | ००.०० | **७०.००** |
| ४ | शासकीय आश्रमशाळा भालेर येथे मुलींचे वसतीगृह बांधणे ता.नंदुरबार जि नंदुरबार | १४०७.९० | ००.०० | **५०.००** |
| ५ | शासकीय आश्रमशाळा अकलापुर येथे मुलींचे वसतीगृह बांधणे ता संगमनेर. जि अहमदनगर | ९११.१५ | ७२.०४ | **७०.००** |
| ६ | शासकीय आश्रमशाळा जवळेवाळेश्वर येथे मुलींचे वसतीगृह बांधणे ता. अकोले जि अहमदनगर | ९१७.७१ | ५९.०९ | **७०.००** |
| ७ | शासकीय आश्रमशाळा अकलापुर येथे मुलांचे वसतीगृह बांधकाम ता.संगमनेर जि.अहमदनगर | ९१७.७९ | ७४.४७ | **७०.००** |
| ८ | शासकीय आश्रमशाळा म्हसवंडी ता.संगमनेर जि.अहमदनगर येथे मुलांचे वसतिगृह बांधणे | ९००.७३ | ००.०० | **७०.००** |
| ९ | शासकीय आश्रमशाळा म्हसवंडी ता.संगमनेर जि.अहमदनगर येथे मुलींचे वसतिगृह बांधणे | ९००.७३ | ६०.०० | **४५.००** |
| | **एकुण** | **८३४१.७५** | **५८६.३०** | **५१८.७४** |

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.01.31 15:35:08 +05'30'